**"व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाअंतर्गत "व्यवसाय प्रशिक्षण" तसेच "व्यवसाय शिक्षण" या विभागांसाठी राज्यस्तरीय, विभागस्तरीय व जिल्हास्तरीय खरेदी समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः आयटीआय २०१४/प्र.क्र.१३१/व्यशि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०००३२
दिनांक: १८ मे, २०१७

वाचा : १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग ।।।/ उद्योग-४, दिनांक ३०.१०.२०१५

२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्रमांक: आयटीआय २०१४/प्र.क्र.१३१/ व्यशि-३, दिनांक ०२.०२.२०१६.

३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन शुद्धीपत्रक क्रमांक: आयटीआय २०१४/ प्र.क्र.१३१/ व्यशि-३, दिनांक ०३.०३.२०१६

४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र.: व्यशिअ-२०१६/(७७/१६)/व्यशि-१, दिनांक २३.०६.२०१६.

**प्रस्तावना:-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांकरिता यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी शासन निर्णयासोबत जोडलेल्या **सहपत्र "अ"** मध्ये दर्शविल्याप्रमाणे राज्यस्तरीय, विभागस्तरीय व जिल्हास्तरीय खरेदी समित्या तसेच महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, मुंबई यांचेस्तरावरील खरेदी समिती स्थापन करण्यास शासनाने संदर्भीय (२) येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. तसेच संदर्भीय (३) येथील शासन शुद्धीपत्रकान्वये **सहपत्र "अ"** मधील विविध समित्यापैकी राज्यस्तरीय खरेदी समितीमध्ये सुधारणा करण्यात आली आहे. दरम्यानच्या काळात शासनाच्या संदर्भीय (४) येथील शासन निर्णयान्वये व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील संचालकांच्या दोन पदांपैकी संचालक, प्रशिक्षण हे एक पद रद्द करून संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण हे एकच पद करण्यात आले आहे. त्यामुळे राज्यस्तरीय खरेदी समितीमध्ये आवश्यक बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

शासनाच्या संदर्भीय (३) येथील शासन शुध्दीपत्रकान्वये स्थापन करण्यात आलेली राज्यस्तरीय खरेदी समिती रद्द करण्यात येत असून व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचलनालय व त्याच्या अधिपत्त्याखालील कार्यालयांकरीता यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**राज्यस्तरीय खरेदी समिती (२.९.२)**

| | | |
|---|---|---|
| १ | संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सह सचिव/ उप सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ३ | खरेदी प्रक्रीयेशी संबंधित कामकाज हाताळणारे सहसंचालक/ उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

| | | |
|---|---|---|
| ४ | लेखा व कोषागार संचालनालयातील गट-अ किंवा गट-ब दर्जाचा लेखाधिकारी | निमंत्रित |
| ५ | उद्योग सहसंचालक (भांडार खरेदी)/उद्योग संचालनालय किंवा त्यांचे प्रतिनिधी | निमंत्रित |
| ६ | अन्य विभागांकडून कोणताही निमंत्रित आवश्यकता असल्यास | निमंत्रित |
| ७ | तांत्रिक तज्ञ, आवश्यकता असल्यास | निमंत्रित |

२. शासनाने संदर्भीय (२) येथील शासन निर्णयान्वये स्थापन केलेल्या विभागस्तरीय खरेदी समिती, जिल्हास्तरावर खरेदी समिती तसेच महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, मुंबई यांचेस्तरावरील खरेदी समिती या समित्यांची रचना संदर्भीय (२) येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिल्यानुसारच राहील. तथापि, राज्यस्तरीय खरेदी समितीसंदर्भातील वरील सुधारणा विचारात घेऊन व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालयांतर्गत करावयाच्या खरेदीसंदर्भात नियमानुसार आवश्यक कार्यावाही करण्याची दक्षता संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी घ्यावी.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१८१२३०१७०८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0363f5e4d45eb33c0938f1f8861984f0e8a091632e6750ca13da0bc6a5549fad, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f504695966d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2017.05.18 12:34:05 +05'30'

**( विवेक मा. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, मुंबई
७. सचिव, महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण परीक्षा मंडळ, मुंबई
८. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई
१०. सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, (संचालनालयामार्फत)
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नागपूर/नाशिक/औरंगाबाद/अमरावती
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)
१४. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत)
१५. प्राचार्य, सर्व संबंधित औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत)
१६. मुख्याध्यापक, सर्व संबंधित शासकीय तांत्रिक विद्यालय (संचालनालयामार्फत)
१७. सर्व अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. कार्यासन अधिकारी (उद्योग-४), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.